सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदानाचे ११ पंचायतराज प्रशिक्षण केंद्र यांना वितरण करण्याबाबत.

---

मुख्य लेखाशिर्ष-२०५३०५७४.
सहावा हप्ता (वेतन व वेतनेतर)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्रशिक्षण-२०२४/प्र.क्र.७९/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई- ४०० ००१
दिनांक : २८ मार्च, २०२५.

वाचा -

१) ग्रा.वि. व ज.सं.वि., शा.नि.क्र. प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि. १७.०९.१९९३.
२) ग्रा. वि. व ज.सं.वि., शा.नि. क्र.- प्रशिक्षण ११९९/ प्र.क्र.५८१/६१, दि. २३.९.१९९८
३) ग्रा.वि.व ज.वि., शा.नि.क्र.-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि. १२.६.२००१.
४) वित्त विभाग, शा.परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ.-३, दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५.
५) ग्रा.वि.वि, शा.नि.क्र.अनुपं-२०२४/प्र.क्र.५०/आस्था-१५, दि.३०.४.२०२४ व दि.०६.०८.२०२४
६) ग्रा.वि.वि, शा.नि.क्र. पुरक-२०२४/प्र.क्र.१०५/आस्था-१५, दि.२१.०८.२०२४
७) ग्रा.वि.वि, शा.नि.क्र. अनुग्रा-२०२४/प्र.क्र. ७९/आस्था-१५, दि.२७.११.२०२४, दि.०४.०२.२०२५ व दि.०३.०३.२०२५.

प्रस्तावना -

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र. एल-२, "२०५३, जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र (अनिवार्य), ३१-सहायक अनुदान (वेतनेतर), ३६-सहायक अनुदान (वेतन) (सांकेतांक क्र. २०५३०५७४) अंतर्गत ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रे यांना वेतनेतर उद्दिष्टासाठी रु.२५,५०,०००/- (रुपये पंचवीस लक्ष पन्नास हजार फक्त), वेतन उद्दिष्टासाठी रु. ५,६७,७७,०००/- (रुपये पाच कोटी सदुसष्ट लक्ष सत्याहत्तर हजार फक्त) असे एकूण रु.५,९३,२७,०००/- (रुपये पाच कोटी त्र्याण्णव लक्ष सत्तावीस हजार फक्त) इतका सुधारित अंदाज अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर अर्थसंकल्पित अनुदानापैकी सहावा हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता ११ पंचायतराज प्रशिक्षण केंद्र यांना संदर्भ क्र.५ ते ७ येथील शासन निर्णयान्वये ३६, सहायक अनुदाने (वेतन) व ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता खालीलप्रमाणे अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

(रक्कम : हजारात)

| दि.३०.०४.२०२४ पहिला हप्ता (वेतन) | दि.०६.०८.२०२४ दुसरा हप्ता (वेतन) | दि.२१.०८.२०२४ (७वा वेतन आयोग फरक) (वेतन) | दि.२७.११.२०२४ तिसरा हप्ता (वेतनेतर) | दि.०४.०२.२०२५ चौथा हप्ता (वेतन) | दि.०३.०३.२०२५ पाचवा हप्ता (वेतन) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १२२५७.२६४ | १७७५१.७३६ | १३९०७.०० | २१८५.८० | ६४३०.५०० | १७२१.७७५ |

२. आता, वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ.-३, दि.१७.०३.२०२५ नुसार ११ पंचायतराज प्रशिक्षण केंद्रांपैकी ३ प्रशिक्षण केंद्रांना वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेनुसार तसेच संबंधित प्रशिक्षण केंद्राच्या मागणीनुसार ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरिता रु.२,३०,९६७/- (रुपये दोन लक्ष तीस हजार नऊशे सदुसष्ट फक्त) व ११ पंचायतराज प्रशिक्षण केंद्रांपैकी २ प्रशिक्षण केंद्रांना ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता रु.३,६४,२००/- (रुपये तीन लक्ष चौसष्ट हजार दोनशे फक्त) असा एकुण रु.५,९५,१६७/- (रुपये पाच लक्ष पंच्याण्णव हजार एकशे सदुसष्ठ फक्त) इतका निधी सहावा हप्ता म्हणून वितरित करण्यास शासन मान्यता देत आहे.

३. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. हा खर्च "मागणी क्र.एल-२, २०५३, जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र, ३६, सहायक अनुदाने (वेतन) व ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (संकेतांक क्र. २०५३ ०५७४)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो या लेखाशीर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच लेखाशिर्षाखाली खर्च पडतो आहे, याबाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित विभागीय आयुक्त कार्यालयातील उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

५. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरित करताना वेतन/वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरित केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतन/वेतनेतरकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन/वेतनेतर बाबींकरिता अनुदान वितरित करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

६. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र/संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

७. हा शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार अ.क्र. ४ परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून तसेच वित्त विभागाकडील अनौ.संदर्भ क्र.२०१/व्यय-१५, दि.२१.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३२८१३१२२५३६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

KAUSTUBH SUDHAKAR RANE

Digitally signed by KAUSTUBH SUDHAKAR RANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=78b99ab06beb869e5c389d21dd25d4a1a60d87c91cb0bb868021d70abc925c3b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAAAFEFABBD1DFDAD691286AA9D035C7536D65527975D97124960BB882959CDB, cn=KAUSTUBH SUDHAKAR RANE
Date: 2025.03.28 17:12:17 +05'30'

(कौस्तुभ राणे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत :

१) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे.
२) विभागीय आयुक्त , पुणे व अमरावती (प्रत्येकी २ प्रती).
३) संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे.
४) उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे व अमरावती.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, व अमरावती.
६) महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
७) महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - २, नागपूर.
८) वित्त विभाग , कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९) प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, वर्ये-जि.सातारा, गारगोटी-जि.कोल्हापूर, खामगाव-बुलढाणा, शिवाजीनगर-अमरावती व पुसद - जि. यवतमाळ.
१०) कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-७ ग्राम विकास विभाग.
११) निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग .

## परिशिष्ट

| शासन निर्णय क्र.प्रशिक्षण-२०२४/प्र.क्र.७९/आस्था-१५, दि.२८ मार्च, २०२५ | | | | |
|---|---|---|---|---|
| सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील सहावा हप्त्याचे वितरण (प्रत्यक्षात रुपये) | | | | |
| अ.क्र. | पंचायत राज प्रशिक्षण केंद्राचे नाव | वेतनेतर | वेतन | एकुण |
| १ | वर्ये, जि.सातारा | ०.०० | ४९,६००/- | ४९,६००/- |
| २ | गारगोटी, जि.कोल्हापूर | ०.०० | १,००,०००/- | १,००,०००/- |
| **अ)** | **विभागीय आयुक्त, पुणे** | **०.००** | **१,४९,६००/-** | **१,४९,६००/-** |
| ३ | खामगाव, जि.बुलढाणा | २,६४,२००/- | ०.०० | २,६४,२००/- |
| ४ | शिवाजीनगर, जि.अमरावती | ०.०० | ८१,३६७/- | ८१,३६७/- |
| ५ | पुसद, जि.यवतमाळ | १,००,०००/- | ०.०० | १,००,०००/- |
| **ब)** | **विभागीय आयुक्त, अमरावती** | **३,६४,२००/-** | **८१,३६७/-** | **४,४५,५६७/-** |
| | **अ)+ब)** | **३,६४,२००/-** | **२,३०,९६७/-** | **५,९५,१६७/-** |

KAUSTUBH SUDHAKAR RANE

Digitally signed by KAUSTUBH SUDHAKAR RANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=78b99ab06beb869e5c389d21dd25d4a1a60d87c91cb0bb868021d70abc925c3b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAAAFEFABBD1DFDAD691286AA9D035C7536D65527975D97124960BB882959CDB, cn=KAUSTUBH SUDHAKAR RANE
Date: 2025.03.28 17:13:26 +05'30'

(कौस्तुभ राणे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.